**वाहन अपघात झाल्यावर मोटार वाहन कायद्याच्या कलम १५८ (६) ची अंमलबजावणी करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

गृह विभाग

परिपत्रक क्र. टिआरए ११०९/२०१०/प्र.क्र. ११९/पोल-८,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १९ जानेवारी, २०१०.

पहावे :- १) प्रधान सचिव, गृह विभाग यांनी पोलीस महासंचालक यांना पाठविलेले अर्ध शासकीय पत्र क्रमांक विपप्र-११०६/२२६४६/सीआर ६४२/पोल-८, दिनांक २३.११.२००६,

२) शासन परिपत्रक क्रमांक टिआरए ११०९/प्र.क्र. २८७/पोल-८, दिनांक २७.११.२००९

## परिपत्रक

मोटार वाहन अपघातात जखमी झालेल्या व्यक्तींना/मृत पावलेल्या व्यक्तींच्या नातेवाईकांना तातडीने नुकसान भरपाई मिळण्याच्या दृष्टीकोनातून अपघाताचा माहिती अहवाल (AIR) तयार करणे, FIR नोंदविणे, मोटार अपघात दावा न्यायाधिकरणात आवश्यक कागदपत्रे पाठविणे इत्यादिबाबत मोटार वाहन कायद्याच्या कलम १५८ (६) मध्ये सूचना देण्यात आलेल्या आहेत. या अनुषंगाने कार्यवाही करण्याबाबत संदर्भाधिन अर्ध शासकीय पत्र व परिपत्रकान्वये सूचना देण्यात आलेल्या आहेत.

२. दरम्यान या विषयाबाबत मा. सर्वोच्च न्यायालयात स्पेशल लिव्ह पिटिशन क्र. ११८०१ ते ११८०४/२००५ वर कार्यवाही सुरु होती. त्यावर मा. सर्वोच्च न्यायालयाने दिनांक १७.१२.२००९ रोजी निकाल देऊन पोलीस, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण तसेच विमा कंपन्यांना काही निदेश/ सूचना दिलेल्या आहेत. त्यापैकी पोलीसांना दिलेल्या निदेशानुसार खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याच्या सूचना आता देण्यात येत आहेत :-

१) मोटार वाहन नियम, १९८९ मधील नियम १५० मध्ये विहित करण्यात आलेल्या फॉर्म क्र. ५४ मधील अपघात माहिती अहवाल (AIR) तात्काळ/जास्तीत जास्त ३० दिवसांच्या आत न चुकता संबंधित मोटार अपघात दावा न्यायाधिकरणात, संबंधित पोलीस स्टेशन प्रमुखाने उपलब्ध करुन द्यावा. या व्यतिरिक्त पोलीसांनी अपघातात सापडलेल्या व्यक्तींचे वय, उत्पन्न, व त्यांच्यावर अवलंबून असलेल्या त्यांच्या कुटुंबातील सदस्यांची नावे व वये याबाबतची माहितीही AIR मध्ये मोटार अपघात दावा न्यायाधिकरणास द्यावी.

२) AIR सोबत FIR, घटना स्थळाचे छायाचित्र, जागेचा नकाशा, वाहन चालकाचा परवाना, वाहनाचे विमा प्रमाणपत्र (आवश्यकता वाटल्यास वाहनाचे फिटनेस प्रमाणपत्र),

मृत्यू झालेल्या प्रकरणी पोस्टमार्टेम रिपोर्ट किंवा जखमी झालेल्या प्रकरणी जखमी झाल्याबद्दलचे प्रमाणपत्र यांच्या प्रमाणित केलेल्या छायांकित प्रती जोडण्यात याव्यात.

३) त्याचबरोबर AIR ची सहपत्रांसह प्रत संबंधित विमा कंपनीलाही पाठवावी, जेणेकरुन विमा कंपनीस विम्याच्या दाव्याची कार्यवाही करणे शक्य होईल.

४) पोलिसांनी मोटार अपघात दावा न्यायाधिकरणातील सुनावणीची पहिली तारीख जखमींना व/किंवा मृतांच्या कुटुंबियांना तसेच वाहन चालक, वाहन मालक व संबंधित विमा कंपनीस कळवावी.

३. प्रशासकीय अडचणींमुळे कदाचित सर्व ठिकाणी एकाचवेळी व तात्काळ, वरीलप्रमाणे संपूर्ण कार्यवाही करणे शक्य होणार नाही. त्यामुळे वरील सूचनांची अंमलबजावणी राज्यामध्ये खालीलप्रमाणे ३ टप्प्यांत करण्यात यावी :-

१) पहिल्या टप्प्यात बृहन्मुंबई क्षेत्रातील सर्व पोलीस ठाण्यांनी/मोटार अपघात दावा न्यायाधिकरणांनी सदर अंमलबजावणी दिनांक ३० एप्रिल, २०१० पर्यंत करावी.

२) दुसऱ्या टप्प्यात राज्यातील इतर सर्व जिल्हा मुख्यालयातील सर्व पोलीस ठाण्यांनी/मोटार अपघात दावा न्यायाधिकरणांनी सदर अंमलबजावणी दिनांक ३१ ऑगस्ट, २०१० पर्यंत करावी.

३) तिसऱ्या टप्प्यात उर्वरित सर्व पोलीस ठाण्यांनी/मोटार अपघात दावा न्यायाधिकरणांनी सदर अंमलबजावणी दिनांक ३१ डिसेंबर, २०१० पर्यंत करावी.

४. वर परिच्छेद-२ मध्ये नमूद करण्यात आल्यानुसार व परिच्छेद-३ मध्ये नमूद केलेल्या टप्प्यांमध्ये, मोटार वाहन कायद्याच्या कलम १५८ (६) ची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने महासंचालक व पोलीस महानिरिक्षक, महाराष्ट्र राज्य यांनी आवश्यक नमुने व आवश्यक त्या सर्व सोयी सुविधा सर्व पोलीस ठाण्यांना पुरविल्या जातील याची खातरजमा करावी. परिवहन विभाग व आरोग्य विभागाने याबाबतीत संबंधित सर्व पोलीस अधिकाऱ्यांना आवश्यक सहकार्य करावे.

५. परिच्छेद-३ मध्ये नमूद करण्यात आलेली कालमर्यादा ही अंतिम आहे. त्यानुसार परिच्छेद-२ मध्ये नमूद केल्याप्रमाणे अंमलबजावणी सुरु होईपर्यंत, यापूर्वी देण्यात आलेल्या या विषयांबाबतच्या सूचनांनुसार कार्यवाही करण्याचे थांबवू नये.

६. मोटार वाहन कायद्याच्या कलम १४६ मधील तरतुदींचे पालन न करता मोटार वाहन चालविणाऱ्यास किंवा ते चालविण्याची परवानगी देणाऱ्यास/चालू देण्यास कारणीभूत ठरणाऱ्यास सदर कायद्याच्या कलम १९६ नुसार ३ महिन्यांपर्यंतच्या कैदेची किंवा रुपये १,०००/- पर्यंतच्या दंडाची किंवा दोन्ही अशी शिक्षा आहे. मात्र यासाठी संबंधितांवर खटले दाखल करणे आवश्यक आहे. परंतु असे खटले क्वचितच दाखल केले जातात व बऱ्याच प्रकरणांत सदर प्रभावी प्रतिबंधात्मक उपाय

दुर्लक्षित केला जातो. त्यामुळे मोटार वाहन कायद्याच्या कलम १९६ नुसार संबंधितांवर खटले दाखल करावेत.

७. मोटार अपघात दाव्यासंबंधी माहिती देण्याकरिता एक संकेतस्थळ (website) चालू करावी. ज्यावर वर परिच्छेद-२ मध्ये नमूद करण्यात आलेल्या माहितीची/कागदपत्रांची नोंद करावी. संकेतस्थळाबाबतची कार्यवाहीसुद्धा परिच्छेद-३ मध्ये नमूद करण्यात आल्यानुसार तीन टप्प्यात करावी.

८. पोलीस ठाण्यात संगणकावर तसेच नोंदवही ठेऊन त्यात अपघाताची माहिती अद्ययावत ठेवण्यात यावी. एखाद्या मुद्याची माहिती उपलब्ध नसल्यास ती उपलब्ध नसल्याची कारणेही नोंदवावीत. न्यायाधिकरणाकडे फॉर्म पाठविल्याचा दिनांक लाल शाईने लिहिण्यात यावा. यासाठी पोलीस महासंचालक, महाराष्ट्र यांनी सविस्तर सूचना द्याव्यात.

९. अपघात नोंदवहीचा, तसेच त्या संबंधात झालेल्या कार्यवाहीचा वरिष्ठ पोलीस अधिकाऱ्यांनी (उपविभागीय पोलीस अधिकारी, पोलीस अधिक्षक, पोलीस आयुक्त, विशेष पोलीस महानिरिक्षक) यांनी संबंधित पोलीस ठाण्याच्या वार्षिक निरीक्षणाच्यावेळी आढावा घ्यावा. निरिक्षणाअंती वरील बाबीची अंमलबजावणी करण्यात कसूर झाल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित अधिकाऱ्यांविरुद्ध शिस्तभंगाची कार्यवाही करावी.

१०. उपरोक्त कागदपत्रे मोटार अपघात दावा न्यायाधिकरणांस पाठविल्याची/उपलब्ध झाल्याची खात्री झाल्यानंतर संबंधित पोलीस ठाण्याचे अधिकारी मोटार अपघातासंबधीचे दोषारोपपत्र न्यायाधिकरणास सादर करतील.

११. मोटार अपघात दाव्यांच्या प्रलंबित प्रकरणांबाबत झालेल्या प्रगतीचा आढावा संबंधित पोलीस अधिक्षक किंवा उपविभागीय पोलीस अधिकारी यांनी दरमहा होणाऱ्या कायदा व सुव्यवस्थेच्या बैठकीच्या वेळी घ्यावा.

१२. अपघात करणारे वाहन सोडण्यापूर्वी वाहन चालकाचा परवाना, वाहनाचा नोंदणी परवाना, फिटनेस व विम्याबाबतची कागदपत्रे प्राप्त करावीत व या कागदपत्रांची एक प्रत पोलीस स्टेशनमध्ये ठेवावी.

१३. उपरोक्त निदेशाची अंमलबजावणी करण्याच्या सूचना आपल्या अधिनस्त असलेल्या सर्व पोलीस ठाण्याच्या प्रभारींना देऊन त्यासंबधीचा पूर्तता अहवाल शासनास पाठविण्यात यावा.

(अ. न. नाईकनवरे)

सह सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रति,

१) अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३) सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

४) अप्पर पोलीस महासंचालक (वाहतूक), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
५) सर्व विशेष पोलीस महानिरिक्षक.
६) सर्व पोलीस आयुक्त.
७) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८) सह पोलीस आयुक्त (वाहतूक), मुंबई.
९) सर्व पोलीस अधिक्षक.
१०) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)
११) प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधीकरण, मुंबई/ठाणे/पुणे/नागपूर.
१२) सर्व जिल्हा न्यायालये.
१३) निवडनस्ती (पोल-८)